**श्रीमती प्रणिता वामनराव मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांचा राजीनामा मंजूर करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.राजीना-५९१५/१२४४/प्र.क्र.२११/नवि-२७,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :-०६ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :- १. श्रीमती प्रणिता वामनराव मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांचा राजीनामा अर्ज, दि.२२.०६.२०१५.

२. सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांचे पत्र दि. २४.०६.२०१५.

३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.आस्था/प्रवामो/सनर/प्रशा-१/५०२२, दि.०७.०८.२०१५.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्रीमती प्रणिता वामनराव मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांनी त्यांच्या संदर्भ-१ येथील दि.२२.०६.२०१५ रोजीच्या राजीनामा अर्जान्वये त्यांना ऑस्ट्रेलिया येथील पदव्युत्तर शिक्षणासाठी डॅक्केन युनिव्हर्सिटी, मेलबर्न ऑस्ट्रेलिया येथे प्रवेश घेण्याकरिता अर्जाच्या दिनांकापासून त्यांचा राजीनामा स्वीकृत करण्याची विनंती केलेली आहे. सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांनी त्यांच्या संदर्भ-२ येथील दि.२४.०६.२०१५ च्या पत्रान्वये श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांचा अर्ज पुढील आवश्यक त्या कार्यवाहीस्तव संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयास सादर केलेला आहे.

**०२.** सहाय्यक नगर रचनाकार (श्रेणी-१) पदाचे नियुक्ती प्राधिकारी शासन असल्याने संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भ-३ येथील दि.०७.०८.२०१५ च्या पत्रान्वये श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा स्वीकारण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०३.** सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ-४ येथील दि.०२.१२.१९९७ मधील परिच्छेद क्र.११ मधील (अ) ते (ड) येथील विहित अटींची पूर्तता करीत असून अट क्र. (ड) नुसार त्यांनी राजीनामा मंजूरीकरिता एक महिन्याच्या पूर्वसूचनेऐवजी एक महिन्याच्या मूळ वेतनाची रक्कम दि.१९.०९.२०१५ रोजी चलनाव्दारे शासकीय कोषागारात भरणा केलेली आहे.

**०४.** सबब, श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्रीमती प्रणिता वामनराव मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांचा दि.२२ जून, २०१५ (म.नं.) पासून राजीनामा स्वीकारण्यात (मंजूर) करण्यात येत असून त्यांना "सहाय्यक नगर रचनाकार" पदावरुन शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यात येत आहे.

**०२.** श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा देण्याचा हेतू स्पष्ट झाल्याची खातरजमा करण्यात आली आहे.

**०३.** श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांच्या राजीनाम्यापूर्वी त्यांच्या विरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित / प्रस्तावित नाही.

**०४.** श्रीमती प्र. वा. मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार यांच्याकडून शासनास कोणत्याही प्रकारचे येणे नाही.

**०५.** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील परिच्छेद २ (इ) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५१००६१७२०५८१३२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.10.07 12:13:03 +05'30'

**( दि. सि. अणेराव )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. (३-प्रती)
६. विभागीय सह संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
७. सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद, श्री. उमाळकर यांची इमारत, पहिला मजला, सांस्कृतिक मंडळासमोर, खडकेश्वर, औरंगाबाद.
८. श्रीमती प्रणिता वामनराव मोटेवाड, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, औरंगाबाद यांना संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.
९. निवडनस्ती (नवि-३).

*****